वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव या संस्थेमधील वर्ग ३ ची नियमित पदे तात्पुरत्या स्वरुपात बाह्यस्त्रोतामार्फत भरणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
## शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२३/प्र.क्र.१७/प्रशासन-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग
नविन मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: १ जून २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः एमईडी-२०१६/प्र.क्र.१८५/१६/शिक्षण-१, दिनांक ११.०५.२०१७.
२) शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः पदनि-२०१७/प्र.क्र.९१/वैसेवा-२, दिनांक ०७.०७.२०१८.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.२२९/प्रशासन-२, दि. १७.०४.२०१५.
४) शासन परिपत्रक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. संकिर्ण-२०१९/प्र.क्र.१३/कामगार-८, दि. २२.०२.२०१९.
५) शासन अधिसूचना, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. किवेअ.१०१५/४१८/प्र.क्र.१४०/कामगार-७, दि. २४.०७.२०१९.
६) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.DMER-१५०११/११/२०२२-ईएसटी-३, दि. २५.०१.२०२३.
७) अधिक्षक, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव यांचे पत्र क्र. जा.क्र. शावैमज/आस्थापना-३/बाह्यस्त्रोत मनुष्यबळ/११८२-८३, दिनांक १७.०५.२०२३.

**प्रस्तावना :-**

विभागाच्या संदर्भ क्र. १ वरील दिनांक ११.०५.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये जळगांव येथे १०० विद्यार्थी क्षमतेचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ५०० रुग्ण खाटांचे रुग्णालय सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र. २ वरील दिनांक ०७.०७.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये विविध संवर्गातील नियमित व काल्पनिक पदे मंजूर करण्यात आली आहेत. सदर संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयाच्या विवरणपत्र अ मध्ये नमुद पदांपैकी शासकीय वैद्यकीय महाविद्यालयासाठी आवश्यक असलेली २२२ नियमित पदे बाह्यस्त्रोतामार्फत भरण्यासाठी संस्थास्तरावर निविदा प्रक्रिया राबविण्यात आली आहे. सदर निविदा प्रक्रियेमध्ये एकूण १६ निविदाधारक पुरवठादारांनी भाग घेतला असून ५ निविदाधारक पुरवठादारांचा तांत्रिक लिफाफा उघडण्यात आला आहे. त्यात न्युनत्तम दरानुसार मे. यशोधरा महिला औद्योगिक सहकारी संस्था मर्या. या सेवा पुरवठादारास संस्थेतील वर्ग ३ ची विविध २२२ पदे पुरवठा करण्यास व त्यानुसार येणा-या वार्षिक खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जळगांव या संस्थेमधील २२२ नियमित पदे बाह्यस्त्रोतामार्फत उपलब्ध करुन घेण्यासाठी राबविण्यात आलेल्या निविदा प्रक्रियेमध्ये न्युनत्तम दरानुसार पात्र ठरलेल्या मे. यशोधरा

महिला औद्योगिक सहकारी संस्था मर्या. या सेवा पुरवठादाराने प्रस्तावित केलेल्या (सेवा शुल्कासह) दरानुसार वर्ग-३ ची विविध संवर्गातील खालील तक्त्यात नमुद २२२ पदे पुरवठा करण्यास तसेच त्याअनुषंगाने येणा-या रु. ५,९४,०८,६९०/- (सर्व शुल्कांसह) (अक्षरी रुपये पाच कोटी चौ-यानव लक्ष आठ हजार सहाशे नव्वद केवळ) एवढ्या अंदाजित ११ महिन्यासाठी येणा-या खर्चास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे नाव | पदसंख्या | न्युनत्तम दरानुसार एका पदासाठी मासिक खर्च रुपये | न्युनत्तम दरानुसार एकूण मासिक खर्च रुपये | ११ महिन्यासाठी येणारा खर्च रुपये |
|---|---|---|---|---|---|
| १ | आहारतज्ञ | १ | २५,०००/- | २५,०००/- | २,७५,०००/- |
| २ | औषधनिर्माता | १० | १९,६०२/- | १,९६,०२०/- | २१,५६,२२०/- |
| ३ | क्ष-किरण सहायक | २ | १७,८९०/- | ३५,७८०/- | ३,९३,५८०/- |
| ४ | लिपिक टंकलेखक | ८ | १६,०००/- | १,२८,०००/- | १४,०८,०००/- |
| ५ | विद्युत यांत्रिकी | १ | १५,९९०/- | १५,९९०/- | १,७५,८९०/- |
| ६ | अधिपरिचारीका | २०० | २५,०००/- | ५०,००,०००/- | ५,५०,००,०००/- |
| | एकूण | २२२ | | ५४,००,७९०/- | ५,९४,०८,६९०/- |

१) सदर प्रशासकीय मान्यतेची मुदत ११ महिने अथवा नियमित भरती प्रक्रियेद्वारे पदे उपलब्ध होईपर्यंत जे अगोदर होईल एवढी असेल.

२) उक्त पदांचे न्युनत्तम दरानुसार येणारे वेतन हे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २४.०७.२०१९ रोजीच्या अधिसूचनेतील तरतूदीन्वये किमान वेतन दराशी समतूल्य आहेत याची खातरजमा करण्याची जबाबदारी संबंधित संस्थेच्या अधिष्ठाता यांची राहील.

३) बाह्यस्त्रोताने सेवा उपलब्ध करुन देणा-या सेवापुरवठादाराने, शासनाने निर्धारित केलेल्या दराप्रमाणे वेतन व भत्यांची तसेच वेळोवेळी लागू असलेले करांची अदायगी करणे बंधनकारक राहील.

४) सेवापुरवठादाराने उपलब्ध करुन दिलेल्या मनुष्यबळाला देय असलेले कायदेशिर दायीत्व उदा. भविष्यनिर्वाह निधी, ईएसआयसी, बोनस, लेबर वेलफेअर फंड व अन्य इ. चा समावेश वेतनात अंतर्भूत आहे. तसेच असे कायदेशीर दायित्व संबंधित प्राधिकरणाकडे जमा घेण्यात आलेल्या पदांना किमान वेतन कायद्यानुसार वेतन अदा करण्याची जबाबदारी सेवा पुरवठादाराची राहील.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम भाग पहिला, उप विभाग -४, अ.क्र. ११ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर बाबींसाठी येणारा खर्च शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नंदुरबार या संस्थेस त्यांचे लेखाशिर्षाखाली २२१० जी ३४२ मधील (१०) कंत्राटी सेवा या उद्दिष्टांतर्गत वित्तीय वर्षात अर्थसंकल्पित निधीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०११२०५३६३६१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2023.05.31 23:37:10 -07'00'

**(म. गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)१/२, महाराष्ट्र, मुंबई.
३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. अधिष्ठाता / अधिक्षक, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव.
८. निवडनस्ती (प्रशा-२)